GR 200509301354350001 1201

**शेततळे एकेरी पध्दतीने घेण्यास मान्यता देण्याबाबत.**

महाराष्ट्र शासन,
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
शासन निर्णय क्र.जलसं २००२/प्र.क्र.६६४/जल ७,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- १२ मार्च, २००३.

वाचा :- १. शासन पत्र ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र.मृदसं १०९१/सीआर ३४६/ जल ७, दि.६.११.१९९३.
२. शासन निर्णय ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र.जलयो १०९४/सीआर १८/ जल ७, दि.७.३.१९९४.
३. शासन पत्र ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र.जलयो १०९४/सीआर १८/ जल ७, दि.१.६.१९९४.
४. शासन परिपत्रक ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र.जलसं १०९८/ प्र.क्र.४२०/जल ७, दि.१७.४.१९९८.
५. शासन निर्णय ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र.जलसं १००१/ प्र.क्र.४३३/जल ७, दि.२९.१०.२००१.
६. शासन निर्णय ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र.जलसं १००१/ प्र.क्र.४२६/जल ७, दि.१९.९.२००१.
७. शासन निर्णय ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र.जलसं २००२/ प्र.क्र.६६४/जल ७, दि.३.१.२००२.
८. शासन शुध्दीपत्रक ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र.जलसं २००२/ प्र.क्र.६६४/जल ७, दि.८.१.२००३.

प्रस्तावना :-

महाराष्ट्र राज्यामध्ये पाणलोट क्षेत्र विकास कार्यक्रमांतर्गत शेततळ्याची कामे घेण्याबाबत उपरोक्त संदर्भाधीन क्र.१ मध्ये नमूद केलेल्या शासन पत्र क्र.मृदसं १०९१/सीआर ३४६/जल ७, दि.६.११.१९९३ अन्वये मान्यता देण्यांत आलेली आहे.

राज्यात मोठया प्रमाणावर कोरडवाहू क्षेत्र असल्याने ते क्षेत्र जर पाणलोट क्षेत्राच्या बाहेर असेल तर तेथे शेततळ्याचा उपक्रम राबविणे शक्य होत नव्हते. याबाबींचा विचार करुन शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

<u>शासन निर्णय</u> :-

राज्यात यापुढे पाणलोट क्षेत्राबाहेरील क्षेत्रातदेखील एकेरी पध्दतीने शेततळी घेण्यास शासन मान्यता देत आहे. शेततळ्याचे मापदंड शासनाने शासन निर्णय ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र.जलसं १००१/प्र.क्र.४२६/जल ७, दि.१९.९.२००१ अन्वये निर्धारित केल्याप्रमाणे राहतील व शेततळ्याबाबत तांत्रिक मार्गदर्शक सूचना संचालक (मृदसंधारण) पुणे यांनी त्यांच्या परिपत्रक क्र. मृदसं/शेततळे/मृद ५/२४/२००३, दि.३०.१.२००३ मध्ये नमूद केल्याप्रमाणे राहतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( कि.वं.वाकुल )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रति,
विभागीय आयुक्त, सर्व.
आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे -१.
आयुक्त, आदिवासी विकास महामंडळ, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
संचालक (मृदसंधारण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे -१
जिल्हाधिकारी, सर्व.
मुख्य कार्यकारी अधिकारी , जिल्हा परिषद, सर्व.
विभागीय कृषि सह संचालक ( सर्व )
जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी ( सर्व )
सर्व सह सचिव/उपसचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी (जलसंधारण विभाग),मंत्रालय.
निवड नस्ती, जल - ७.